सातारा जिल्हयांतील पाटण पोलीस ठाण्या अंतर्गत बेलवडे (खुर्द) येथे दूरक्षेत्र स्थापन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
शासन निर्णय क्र. पीओपी- ११०१/३५५/प्र.क्र.११/पोल-३,
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२, दिनांक १६ जानेवारी, २००३

वाचा :- पोलीस महासंचालक यांच्या कार्यालयाचे क्र.पामस /२६/४७/सातारा/२००१ दिनांक २०.१२.२००१ चे पत्र

**शासन निर्णय :-** सातारा जिल्हा बेलवडे खुर्द हे गांव पाटण पोलीस स्टेशनमध्ये समाविष्ठ आहे. या दूरक्षेत्रातील सर्व गांवे डोंगराळ भागात असून या दूरक्षेत्राच्या हद्दीमध्ये मरळी या गांवामध्ये "बाळासाहेब देसाई साखर कारखाना आहे. या भागात पावसाचे प्रमाण जास्त असल्यामुळे लोकांना पाटण पोलीस स्टेशन किंवा मल्हारपेठ दूरक्षेत्राला जाणे अडचणीचे होते.गेल्या तिन वर्षात गुन्हयांचे सरासरी प्रमाण वाढले असून तेथून डोगराळ भागात वाहतुकीची पुरेशी सोय नसल्याने पाटण पोलीस ठाणे येथे संपर्क साधणे फार त्रासाचे होते .व तेथून मदत पोहचण्यास विलंब होतो.

२. वरील सर्व बाबीचा विचार करुन पाटण पोलीस ठाण्या अंतर्गत बेलवडे (खुर्द) येथे दूरक्षेत्र स्थापन करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. त्यासाठी सातारा पोलीस अधिक्षक , यांच्या आस्थापनेवरील मंजूर संख्याबळातून, पुढील प्रमाणे पदे वर्ग करण्यास शासन मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | पोलीस हवालदार | १ |
| २ | पोलीस शिपाई | १ |
| | एकूण | २ |

३. प्रस्तुत दूरक्षेत्राकरिता आवश्यक साधन सामुग्री मंजूर अनुदानातून खरेदी करण्यास पोलीस अधिक्षक ,सातारा यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. यासाठी होणारा खर्च " २०५५ - पोलीस - १०९- जिल्हा पोलीस १०९ (एक)(१) जिल्हा पोलीस बल या लेखा शिर्षा खाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो सन २००२-२००३ च्या पोलीस अधीक्षक सातारा यांच्या मंजूर अनुदनातून भागविण्यात येईल .

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( सं. शां. इंगळे )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

विशेष पोलीस महानिरीक्षक,कोल्हापूर परिक्षेत्र,कोल्हापूर

पोलीस अधीक्षक, सातारा,

प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,

महालेखापाल, महाराष्ट्र-१(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,

जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा,

निवड नस्ती.